**पुस्तकांच्या जगानी किती खजिने दिले**
**किती मित्र दिले आणि जग दाखवले**

पुस्तकांचा हात धरून मी जंगलात भटकले
किती दाट जंगल जमिनीचे दर्शन नाही झाले
वाऱ्याच्या गाण्यांच्या तालावर थिरथिरले
फुलपाखरू माझ्या पापण्यांवर भिरभिरले
कोकिळा अन् पोपट यांची गाणी ऐकत बसले
पुस्तकांच्या जगानी किती खजिने दिले

पुस्तकांचा हात धरून समुद्रात गेले
चित्रविचित्र प्राणी तिथे होते लपले
मगरींचं आणि सुसरींचं राज्य होतं दडलेलं
माकड मात्र एकही शोधून नाही सापडलं
मासे सुंदर सुळसुळत रंग दाखवत गेले
पुस्तकांच्या जगानी किती खजिने दिले

पुस्तकांनी कधी मला केलं राजकुमारी
गालिच्यांनी केली पावलांना गुदगुली
राजाराणीच्या मेजवान्यांना आनंदानं गेले
सख्यांसोबत राणीला गातांना ऐकले
त्या जादूच्या राज्यात मी हरवून गेले
पुस्तकांच्या जगानी किती खजिने दिले

मजनूच्या प्रेमात कशी लैला बुडून गेली
फरियादची शीरी मला खुणावत राहिली
सगळयांची गुपितं मी मनात साठविली

पुस्तकांच्या सरगमची शाल पांघरली
माझ्याही मनात हळूच प्रेम उमलून आले
पुस्तकांच्या जगानी किती खजिने दिले

पुस्तकं कधी अवघड कधी सरळ वाट
वाचत वाचत निजावं कधी व्हावी पहाट
पुस्तकांशी जिवलग दोस्ती न कळता झाली
एकटेपणाची कधी वेळच नाही आली
पुस्तकांच्या संगतीत सारं विसरून गेले
पुस्तकांच्या जगानी किती खजिने दिले

मूळ कविता –कमला भसीन
अनुवाद–शोभा भागवत